**सामान्य राज्य सेवा, गट-ब या संवर्गात अधीक्षक पदांवर सरळसेवेने नियुक्ती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी वाढवून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विभाप-३३१८/प्र.क्र.४३/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: १३ डिसेंबर, २०१९

वाचा : शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : ससप्रे-४३१४/प्र.क्र.८९/प्रशा-२, दिनांक १६.०८.२०१४.

**प्रस्तावना :-**

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : ससप्रे-४३१४/प्र.क्र.८९/प्रशा-२, दिनांक १६.०८.२०१४. अन्वये एकूण ५७ उमेदवारांना सामान्य राज्य सेवा, (प्रशासन शाखा) गट-ब संवर्गात अधीक्षक पदांवर सरळसेवेने नियुक्ती देण्यात आली होती. सदर आदेशातील नियुक्ती स्वीकारलेल्या अधिकाऱ्यांपैकी ०४ अधिकारी हे त्यांच्या रूजू दिनांकापासून विभागीय परीक्षेच्या योग्य संधी उपलब्ध झाल्या नसल्याने सदर उमेदवारांचा परिविक्षाधीन कालावधी एक वर्षाने वाढवून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

सामान्य राज्य सेवा ( प्रशासन शाखा ) गट-ब या संवर्गात अधीक्षक पदांवर सरळसेवेने नियुक्ती देण्यात आलेले खालील ४ अधिकारी हे त्यांच्या रूजू दिनांकापासून घेण्यात आलेल्या विभागीय परीक्षेच्या ३ संधीमध्ये उत्तीर्ण झालेले नाहीत. सदर ०४ अधिकाऱ्यांना विभागीय परीक्षेच्या पर्याप्त संधी उपलब्ध झाल्या नसल्याने त्यांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करणे शक्य झाले नाही. तरी खाली नमूद केलेल्या अधिकाऱ्यांना विभागीय परीक्षेची पर्याप्त व अखेरची संधी उपलब्ध होण्याच्या दृष्टीने त्यांच्या परिविक्षाधीन कालावधीत एका वर्षाने वाढ करण्यात येत आहे. तथापि, ही अखरेची संधी असून, या परीक्षेत उत्तीर्ण न झाल्यास, सेवा समाप्त करण्यात येतील.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | रूजू दिनांक | रूजू दिनांकापासून उपलब्ध केलेल्या विभागीय परीक्षेच्या संधींची संख्या |
|---|---|---|---|
| १. | श्रीमती चित्रा सखाराम भारमळ, | ३०.०८.२०१४ | ३ |
| २. | श्री. सुरेश दत्तात्रय जाधव व | ०८.०९.२०१४ | ३ |
| ३. | श्रीमती निलम सखाराम पाटील | ०१.०९.२०१४ | ३ |
| ४. | श्री. महेंद्र भगत लांडे | १०.०९.२०१४ | ३ |

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२१३१२२००७६९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DEEPAK VIJAY SHELAR

Digitally signed by DEEPAK VIJAY SHELAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6cd30ed620a4fe01f24cb84cc86e70f3b8f6f1fdcdb2469570c78dabb9acf4ba, postalCode=400032, street=ROOM NO 4.4,ANNEX BLDG,SCHOOL EDUCATION DEPT.MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=DEEPAK VIJAY SHELAR
Date: 2019.12.13 12:24:49 +05'30'

**( दीपक शेलार )**

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राद्वारे)
२. आयुक्त (शिक्षण), शिक्षण आयुक्त यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी
४. सर्व संचालक
५. संबंधित विभागीय शिक्षण उप संचालक
६. सर्व संबंधित शिक्षणाधिकारी
७. संबंधित अधिकारी आयुक्त कार्यालयामार्फत

प्रत माहितीसाठी अग्रेषित,

१) मा. मंत्री (शा.शि.) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
२) मा. प्रधान सचिव (शा.शि.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) निवडनस्ती